**प्रशासकीय मान्यता**

**रेवस-रेड्डी सागरी महामार्गाच्या संरेखेवर असणाऱ्या (रा.मा.(विशेष) क्र.५) काळबादेवी येथील पुलाचे बांधकाम करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- खाक्षेस-२०२४/प्र.क्र.९३/रस्ते-८**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १२ मार्च, २०२४.

**संदर्भ :-** शासन निर्णय क्र.खाक्षेस-२०२१/प्र.क्र.२४७/रस्ते-८ दि.०६.०९.२०२१

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ यांनी त्यांच्या दि.१४.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४ रोजीच्या पत्रान्वये रेवस रेड्डी सागरी महामार्गाच्या संरेखेवर असणाऱ्या (रा.मा.(विशेष)क्र.५) काळबादेवी येथील पुलाचे बांधकाम करण्याच्या कामाचे अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यतेस्तव शासनास सादर केले होते.

२. सदर प्रस्तावाच्या छाननी अंती अंदाजपत्रकातील कामाच्या वावातील समाविष्ट बाबी व त्याच्या किंमतीमध्ये सुधारणा केल्यावर येणारे विवरण खालीलप्रमाणे आहे.

**काळबादेवी येथील मोठया पुलाचे अंदाजपत्रक -:**

**RECAPITULATION SHEET**

| Sr. No. | ITEM | Amount In Rs. | Amount In Cr. |
|---|---|---|---|
| 1 | General Items | 2098,72,437.00 | 20.99 |
| 2 | Foundation | 6884,47,625.00 | 68.84 |
| 3 | Sub-Structure | 2698,93,430.00 | 26.99 |
| 4 | Super-Structure | 126,24,15,644.00 | 126.24 |
| 5 | Wearing Coat and Expansion Joint | 324,70,042.00 | 3.25 |
| 6 | Miscellaneous Items | 34,96,986.00 | 0.35 |
| 7 | Approaches | 3607,81,434.00 | 36.08 |
| **A** | **Total Civil Cost A** | **282,73,77,598.00** | **282.74** |
| | Electrification @ Rs. 500/- per SQM(1124*18+4219.9*12) | 354,36,300.00 | 3.54 |
| **B** | **Total Electrical Cost Cost B** | **354,36,300.00** | 3.54 |
| **C** | **Total Construction Cost C= (A+B)** | **286,28,13,898.00** | **286.28** |
| **D** | Maintenance Charges @ 5 % of Total Construction cost (D) | 1431,40,694.90 | 14.31 |
| **E** | **Total Construction cost including Maintenance Cost E=(C+D)** | 300,59,54,592.90 | **300.60** |
| | Royalty Charges (As actual) | **214,80,606.55** | 2.15 |
| **F** | **Total Cost (Civil + Electrical +Maintenance + Royalty) F** | **302,74,35,199.45** | **302.74** |
| | Escalation @ 5 % of Total Construction Cost **( C)** | 1431,40,694.90 | 14.31 |
| | Labour Insurance 1% of Total Construction Cost**(C)** | 286,28,138.98 | 2.86 |
| | Quality Control Charges @ 1.0% of Total Construction Cost**(C)** | 286,28,138.98 | 2.86 |
| | Provision for instrumentation and monitoring charges **(Lumpsum)** | 500,00,000.00 | 5.00 |
| | Environmental monitoring charges 0.1% of total construction Cost**(C)** | 28,62,813.90 | 0.29 |
| **G** | **Sub Total G** | **2532,59,786.76** | 25.33 |
| **H** | **Total H=(F+G)** | **328,06,94,986.21** | **328.07** |

| Sr. No. | ITEM | Amount In Rs. | Amount In Cr. |
|---|---|---|---|
| | Add GST 18% on Total Cost **(E )** | 5410,71,826.72 | 54.11 |
| | Contingencies @ 3% on Total Construction Cost **(C)** | 858,84,416.94 | 8.59 |
| | Centages charges (MSRDC) @ 6% on Total Construction Cost **(C)** | 1717,68,833.88 | 17.18 |
| | **Sub Total I** | **7987,25,077.54** | 79.87 |
| **J** | **Grand Total J=(H+I)** | **407,94,20,063.75** | **407.94** |
| 1 | Design consultancy charges @1% of total Civil cost **(A)** | 282,73,775.98 | 2.83 |
| 2 | Proof consultancy charges @5.0% of Design Consultancy Charges **(J1)** | 14,13,688.80 | 0.14 |
| 3 | Safety consultant @1.0% of Design Consultancy Charges**(J1)** | 2,82,737.76 | 0.03 |
| 4 | Project Management Consultant (PMC) @ 2% of total construction Cost **(C)** | 572,56,277.96 | 5.73 |
| **K** | **Total Consultancy Charges(K)** | **872,26,480.50** | **8.72** |
| | Add 18% GST on **(K)** | 157,00,766.49 | 1.57 |
| **L** | **Total (All consultancy Charges)(L)** | **1029,27,246.99** | **10.29** |
| **M** | **Land Acquisition cost (Lumpsum)** | **3500,00,000.00** | 35.00 |
| **N** | **Utility Shifting Cost** | **114,24,760.00** | 1.14 |
| | **TOTAL PROJECT COST (J+L+M+N)** | **453,23,47,310.74** | **453.23** |

**३. वरील पत्रामध्ये नमूद केल्यानुसार विषयांकित कामाच्या एकूण किंमत रु.४५३,२३,४७,३१० कोटी (अक्षरी रुपये चारशे त्रेपन्न कोटी तेवीस लाख सत्तेचाळीस हजार तीनशे दहा फक्त) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास शासन या आदेशाद्वारे खालील अटींच्या अधिन राहुन प्रशासकीय मान्यता देत आहे.**

(१) मा. मंत्रीमंडळाच्या पायाभूत सुविधा समितीच्या दिनांक २५ ऑगस्ट, २०२१ रोजी झालेल्या बैठकीतील निर्देश व दि.०६.०९.२०२१ चे शासन निर्णयानुसार म.रा.र.वि. महामंडळाला अंशदान ठेव तत्वावर सदर महामार्गाचे काम हाती घेण्यासाठी मान्यता देण्यात आली आहे. या प्रस्तावात सद्य:स्थितीत सदरच्या मंजूर प्रकल्पातील "रेवस रेड्डी सागरी महामार्गाच्या संरेखेवर असणाऱ्या (रा.मा.(विशेष)क्र.५) काळबादेवी येथील पुलाच्या बांधकाम करणे" या कामाचे सविस्तर अंदाजपत्रक सादर केले असून त्याची एकूण किंमत रु.४५३,२३,४७,३१० कोटी (अक्षरी रुपये चारशे त्रेपन्न कोटी तेवीस लाख सत्तेचाळीस हजार तीनशे दहा फक्त) इतकी आहे. प्रस्तावित खाडी पुलाची किंमत ही मंजूर प्रकल्पाच्या किंमतीच्या अधीन असल्याने सद्य:स्थितीत प्रस्तावित अंदाजपत्रकातील तरतूदींसाठी निविदा बोलाविण्यापूर्वी शासन स्तरावरुन मान्यता देण्यात येत आहे. तथापि, सदर प्रकल्पाच्या संपूर्ण लांबीचा सविस्तर प्रकल्प अहवाल तयार झाल्यानंतर, सदर प्रकल्पाची पायाभूत समितीकडून सुधारीत मंजूरी घेणे आवश्यक राहील.

(२) अर्थसंकल्पात पुरेशी तरतूद झाल्याशिवाय प्रत्यक्ष कामास सुरूवात करू नये.

(३) सदर कामाची निविदा मंजूरी ही शासन स्तरावर घेण्यात यावी.

(४) निविदा रकमेपेक्षा कमी दराची मंजूर झाल्यास, होणारी बचत ही बचत म्हणून ग्राह्य धरावी व कामाच्या सुधारीत रकमेस प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

(५) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच पूलाचे व जोडरस्त्याचे संकल्पन करुन सक्षम प्राधिकाऱ्याची मंजूरी घेणे आवश्यक राहील.

(६) ज्या कामास या निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे त्या कामास विचाराधीन असलेल्या नियोजित कोणत्याही पाटबंधारे / जलविद्युत पाणी पुरवठा प्रकल्पामुळे बाधा येत नाही किंवा हे काम अशा योजनांच्या

जलाशयाखाली येणार नाही, अशा अर्थाचे योग्य नमुन्यातील प्रमाणपत्र संबंधित मुख्य अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई यांनी प्रतिस्वाक्षरित केलेले नसून ते या प्रकल्पाच्या कागदपत्रात समाविष्ट नाही.

क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी या कामाच्या प्रत्यक्ष बांधकामास सुरूवात करण्यापूर्वी हे काम कोणत्याही पाटबंधारे / जलविद्युत पाणी पुरवठा प्रकल्पाच्या जलाशयाखाली जाण्याची शक्यता नाही किंवा अशा प्रकल्पामुळे या कामावर कोणताही परिणाम होणार नाही याची खात्री करून घेतली पाहिजे या अटीवरच ही प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

(७) सदरहू कामाचा प्रस्ताव तयार करताना कामाचे समर्थन व आवश्यकता, शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या परिपत्रकातील / पत्रातील सूचनांचे अनुपालन, या सर्व बाबींचा क्षेत्रीय पातळीवर विचार करण्यात आलेला आहे व प्रस्तावाची क्षेत्रीय पातळीवर सर्व तांत्रिक दृष्टीकोनातून छाननी करण्यात आलेली असून, तांत्रिक मान्यता देण्यात आली आहे.

(८) प्रस्तुत कामास प्रत्यक्ष सुरूवात करण्यापूर्वी पुढील बाबींची पुर्तता करण्यात यावी. या अटीवरच ही प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

i. अंदाजपत्रकातील दराबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाचे परिपत्रक क्रमांक-डिएसआर-१०९०/सीआर-६४५३/नियो-३, दि.१४.०७.१९९३ व क्र.जीईएन-१०२००१/सीआर-३/नियोजन-३, दि.२२.०२.२००१ मधील तरतूदींचे अनुपालन झाले असल्याबद्दल खात्री करून घेण्यात यावी.

ii. डांबरीकरणाच्या तरतूदी सा.बां.वि.परिपत्रक क्र-संकीर्ण-२०७/प्र.क्र.२५७/रस्ते-१ दि.२१.०१.२००८, क्र-संकीर्ण-२००९/प्र.क्र.११६/रस्ते-१ दि.०४.१२.२००९ व क्र-संकीर्ण-२०१४/प्र.क्र.०६/रस्ते-१ दि.२६.०५.२०१४ व दि.०७.०८.२०१४ नुसार आहेत याची खात्री तांत्रिक मान्यता प्रदान करणाऱ्या अधिकाऱ्याने करावी.

iii. रस्ते व पुल बांधकामासाठी वन व पर्यावरण व अन्य विभागांची (MCZMA/NCZMA) मान्यता मिळविण्यासाठी आवश्यक त्या अटी पूर्ण करण्यात याव्यात. त्यासाठी संबंधीत संस्थाकडे अर्ज करण्याची जबाबदारी सक्षम अधिकाऱ्यांची राहील.

iv. वाहतूक अडथळ्यांचे प्रमाण अनुज्ञेय राहील याची खातरजमा करण्यात यावी. ही जबाबदारी संबंधीत कार्यकारी अभियंता यांची राहील, तसे प्रमाणपत्र कार्यकारी अभियंता यांनी द्यावे.

v. काम आदिवासी क्षेत्रातील असल्यास संबंधीत प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास यांचे परवानगीचे पत्र मिळविण्यात यावे व आदिवासी व्यक्तींच्या जमीनी संपादन करतांना प्रचलित कायद्याचे पालन करावे.

vi. कामाची सविस्तर अंदाजपत्रके तयार करताना अस्तित्वातील बांधकाम पाडल्यानंतर मिळणाऱ्या सामुग्रीच्या किंमतीचा विचार अंदाजपत्रकात यथोचितपणे करण्यात यावा.

vii. कामास वन जमिनीची आवश्यकता असल्यास संबंधीत प्राधिकरणाची परवानगी घेण्याची जबाबदारी तांत्रिक मान्यता देणाऱ्या अधिकाऱ्याची असेल. वन जमिन ताब्यात मिळाल्याशिवाय डांबरीकरणाचे/ काँक्रीटीकरणाचे काम सुरु करण्यात येऊ नये.

viii. राज्यदरसुचीमधील General Note च्या अनुषंगाने बांधकाम कालावधी करीता आवश्यक सर्वसाधारण विम्याची तरतूद सादरकर्त्या सक्षम अधिकाऱ्याने प्रस्तावीत केल्यानुसार करण्यात आली आहे. तथापि, सदर परिच्छेदानूसार देखभाल दुरुस्ती व दोषदायीत्व कालावधीकरीता विम्याची तरतूद तांत्रीक मान्यता प्रदान करणारे सक्षम अधिकारी तांत्रीक मान्यता अंदाजपत्रकाच्या गोषवाऱ्यामध्ये केली आहे असे ग्राह्य धरण्यात आले आहे. या शर्तीवर सदर प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

ix. कामासाठी मंजूर निधीच्या मर्यादेच्या अधीन राहूनच खर्च करण्यात यावा.

x. प्रस्तावित काम हे शासनाच्या ताब्यातील जागेवरच करण्यात यावे. खाजगी किंवा इतर मालकी जागेत करावयाचे झाल्याचे त्याचे प्रचलित भूसंपादन नियमानुसार लागणारी जमिन संपादीत करुन व जमिनीचा सर्व मोबदला अदा करुन नंतरच कामास सुरुवात करावी.

xi. कंत्राटदाराशी करावयाच्या करारनाम्यात रस्ता किंवा पूल याचे संकल्पित आयुर्मान दर्शवून त्या कालावधीत कामात दोष निर्माण झाल्यास त्याची जबाबदारी कंत्राटदार व संबंधित पर्यवेक्षकीय अधिकारी यांची राहील.

अशा प्रकरणी कंत्राटदार व संबंधित पर्यवेक्षकीय अधिकारी यांचेवर नियमानुसार कार्यवाही करण्यात येईल" अशा आशयाची अट करारनाम्यात समाविष्ट करावी.

xii. रस्त्याच्या भौमित्तिक मानकांबाबत शासन परिपत्रक क्र.बिडीएम-१०८७/सीआर-५३०६/नियोजन-३ दि.१३.०५.१९८८ मधील तरतूदींचे तंतोतंत पालन करण्यात यावे.

xiii. सदर पूलाच्या Navigational Clearance घेण्यासाठी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड (MMB) अथवा सक्षम प्राधिकाऱ्याकडे प्रस्ताव सादर करुन त्याच्या मंजूरीनंतरच पूलाचे व जोडरस्त्याचे संकल्पन करुन कामे कार्यान्वीत करावीत.

(९) प्रस्तुत कामास कार्यारंभ आदेश देण्यापूर्वी सदर रस्त्यासाठी लागणारी जमीन महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाच्या ताब्यात आहे याची खातरजमा करून घ्यावी.

(१०) प्रशासकीय मान्यतेच्या अंदाजपत्रकात प्रत्येक दराचे वर्णन/दर/दर पृथ:करणातील गृहीत धरलेली अंतरे व अनुषंगिक इतर बाबी तांत्रिक मान्यता प्रदान करण्यास सक्षम अधिकाऱ्यांनी तपासले आहे अशी धारणा आहे. या संदर्भात शासनाचे कोणतेही उत्तरदायित्व असणार नाही.

(११) Instrumentation and Health monitoring करीता (Lumpsum) तरतूद धरण्यात आलेली आहे. त्याचा सविस्तर आराखडा तयार करुन सदर प्रस्तावास शासनाची मंजूरी घेणे आवश्यक राहिल.

(१२) भूसंपादनासाठी प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रकातील तरतूदीचा ठोबळमानाने असल्याने, झालेल्या खर्चाचा सविस्तर तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे बंधनकारक राहिल.

(१३) कार्यारंभ आदेश देण्यापूर्वी रेवस रेड्डी प्रकल्पाचा एकत्रित सुधारित प्रस्ताव तयार करुन पायाभूत सुविधा समितीची मंजूरी घेणे आवश्यक राहिल.

(१४) सदर कामावरील खर्च हा मागणी क्र. एच-७, ५०५४-मार्ग व पुल यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण, १९०-सार्वजनिक क्षेत्र आणि इतर उपक्रमांना सहाय्य, (०२)-सागरी महामार्गाचा विकास (०२)(०१)-रेवस रेड्डी सागरी महामार्गाच्या विकासासाठी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम) (५०५४५३९६), ५४ गुंतवणूका या प्रदान शिर्षाअंतर्गत भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय, अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या अनुमतीने काढण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१२१८३७४४४६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAHUL TUKARAM GIRIBUWA

Digitally signed by RAHUL TUKARAM GIRIBUWA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=0b4757980eebc66dc0389128fa23dfb9a970f0ed30b5db54f68cc9a600aa440e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=07BA69616C0D315D2EEB21CE93D1A64B749308CEB99C310360D2F36CBE22F228, cn=RAHUL TUKARAM GIRIBUWA
Date: 2024.03.12 18:46:47 +05'30'

**(राहुल गिरीबुवा)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री, (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. उपमुख्यमंत्री, (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

७) सर्व मा.मंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
९) सर्व विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य.
१०) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
११) महालेखापाल महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेय) मुंबई.
१२) महालेखापाल महाराष्ट्र २ (लेखापरिक्षा) नागपूर.
१३) अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
१४) अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई.
१५) अपर मुख्य सचिव (महसूल व वन विभाग), मंत्रालय, मुंबई.
१६) अपर मुख्य सचिव (सार्वजनिक बांधकाम विभाग), मंत्रालय, मुंबई.
१७) प्रधान सचिव (विधि व न्याय विभाग), मंत्रालय, मुंबई.
१८) प्रधान सचिव (नगर विकास विभाग), मंत्रालय, मुंबई.
१९) प्रधान सचिव (उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग), मंत्रालय, मुंबई.
२०) प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य विभाग), मंत्रालय, मुंबई.
२१) प्रधान सचिव (पर्यटन विभाग), मंत्रालय, मुंबई.
२२) प्रधान सचिव (पर्यावरण विभाग), मंत्रालय, मुंबई
२३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२४) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, म.रा.र.वि. महामंडळ, वांद्रे, मुंबई-५०.
२५) मुख्य अभियंता, म.रा.र.वि. महामंडळ, वांद्रे, मुंबई-५०.
२६) सर्व सहसचिव/ आंतर वित्तीय सल्लागार तथा उप सचिव/ उप सचिव / अवर सचिव / कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२७) निवडनस्ती (रस्ते-८).